भुजगानें त्याच्या उघड्या पाठीवर शिवळीचे तडाखे दिले. हा बेदम मार पाटील कसा विसरणार ? त्यानें सापासारखा डूख धरला आणि भिल्लांच्या मदतीनें भुजगाचा वाडा पेटवून दिला. पाखर जतीचें संकटहि त्यानें आणलें व भुजगाकडे आलेल्या आनंदरावावर राजमलचा खून केल्याचा आरोप घातला. पण या सर्व सत्त्वपरीक्षेंतून भुजगा उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाला, एवढेंच नव्हे तर, रभाजीचे भिल्ल त्याच्यावर उलटले असताना आणि रभाजीच्या वाड्याची जाळपोळ करूं लागले असताना, भुजगा जिवावर उदार होऊन रभाजीच्या मदतीस धावतो–त्याचेवर दयेचा अभिषेक करतो आणि त्याला पावन करून सोडतो असें हें भुजगाचें स्वभावचित्र अत्यंत उदात्त आहे. त्याचेवर खोट्या आरोपावरून खटला चालू असताना, तो " पिंजऱ्यात धीरगंभीर असा बसला होता जणूं काय तो न्यायाधीशालाच न्याय देणार असें वाटत होतें. " आणि भोळ्या भावाचे भिल्ल तर काय ? " आईबापानीं आम्हांला जन्म एकदा दिला, भुजगा देवानं दुसऱ्यांदा दिला. आम्ही भिल्लानीं भुजगाला देव करून देव्हाऱ्यात ठेवलें आहे आम्ही त्याची रोज पूजा करतों " असें ते मानीत.

## सात्त्विक गुणाचा पुतळा

भुजगाला देवाविषयीं भक्ति जितकी गाढ व गरिबांविषयीं दया जितकी अपार, तितकीच अन्यायाची चीडहि तीव्र आणि शेवटीं क्षमाहि निःसीम त्याला पाण्यात पहाणाऱ्या रभाजी पाटलालाहि बेदम मार बसला व त्याच्या पाठीचीं धिरडीं निघालीं, तेव्हा भुजगा काय करतो ? " रभाजीचे पाठीस हळद व तेल लावताना पारू रभाजीची कृति अगदीं विसरून गेली होती. रभाजीस स्पर्श करताना तिला कोणत्याहि प्रकारचा संकोच वाटत नव्हता. दयेचा जोर एकेपेक्षा अधिक आहे. तिचे मनात उत्पन्न झालेल्या दयेनें तिचे एकेला हाकून दिलें होतें भुजगा हळद तेल लावताना " अरे, अरे," " चरचक " असें खेदाने आपल्याशींच पुटपुटत होता. दयेनें त्याचें अंतःकरण ओथंबलें होतें."

भुजगा आनंदरावाच्या अंगातील सात्त्विक गुणाचा गौरव किती

सूचकतेनें करीत आहे, पण —",आज तुकारामबुवा जिवत असते तर त्यांनी अभंगात काय लिहिलें असतें?" भुजबान विचारलं.

"त्यांनी अभंग लिहिले नसते. देहूला शास्त्रीय प्रयोग शाळा काढली असती" आनंदरावानें उत्तर केलें.

"मला वाटतें, त्यांनी कॉर्पेरेशाँपी ती काढली आहे" भुजबाचे विनोदान सर्व शेतकरी मनापासून हसले."

## सह्याद्रीवर रूपक

महाराष्ट्राचा पिता म्हणजे सह्याद्रि. त्याच्या स्वरूपाचं वर्णन दिघे पुढीलप्रमाणें करतात, "उंच उंच आकाशाला भिडलेला नीट कड्याचा डोंगर शंकरासारखा ताठ मोठ्यानं उभा आहे, त्याचे माथ्यावरून शुभ्र पाण्याची धोद गर्जना करून खालीं पडत आहे त्या डोंगराच्या माथ्यावर मध्यान्हकाळीं पारव्याचे कंठाप्रमाणं दिसणाऱ्या हिरव्या–निळ्या–तांबड्या–जांभळ्या आकाशात जेव्हां चंद्रकोर व शुक्राचा तारा दिसे, तेव्हा डोंगराच्या जटाजूटतन–गंगावतरणाचा अभिनय चालला आहे असं वाटे. शुक्राचा तारा म्हणजे शंकराचा तृतीय नेत्रच! पाण्याचा खालीं पडणारा धबधबा म्हणजे जटेतून उडी मारणारी गंगा माथ्यावरची चंद्रकोर म्हणजे भाळीं धरलेली चंद्रलेखा."

## पाणकळ्यातील संगीत

पावसाळ्याचे परिणाम एकंदर सृष्टीवर किती भिन्न, भिन्न व रमणीय होतात, याचीं शब्द-चित्रें दिघे यानीं सुरेख काढलीं आहेत. "हा 'पाणकळा' म्हणजे शेतकऱ्याचं जीवन, सुखाचें स्वप्न, आनंदोत्सव. मातींत राबणाऱ्या व काबाडकष्ट करणाऱ्या जीवाचें 'पाणकळा' म्हणजे विश्वसंगीत. वाजत गाजत गर्जन येऊन त्यानं तापलेल्या कस्तुरीच्या काळ्या वावरात अमृताची बरसात सुरू केली, की लाखों कमळें फुलल्याप्रमाणं मातीचा सुगंध पसरतो. खेड्यातील लोक शेतात स्वप्न लागतात, कस्तुरीच्या वावरात पाभरी सुरू होतात व त्यातून मोत्याचा पेरा होतो. पावसात दिवस

पर्जन्यराजाच्या आगमनावर किती सुंदर उत्प्रेक्षा रचल्या आहेतः—
" कडकडत गडगडत ता आज येथें पडला, तर उद्यां त्यांत क्षितिजावर पटनांना दिसेल व काळ्या ढगांतून पडणाऱ्या त्याच्या धारा नळवंतीच्या सुटलेल्या केशकलापाप्रमाणें दिसतील; कधींकधीं त्यांत विजेची कलाबूत किंवा इंद्रधनुष्याचे रंग दिसतील, तर कधीं तो स्वर्गातून सोडलेल्या झुलत्या जिन्यासारखा दिसेल. शेतकऱ्यांचा स्वर्ग याच जिन्यानें खालीं येतो. ऊन्ह-पावसाच्या तिरपेत इंद्रधनुष्याच्या कमानींतून हा स्वर्ग पावसाळ्यात कैक वेळां पहावयास मिळतो. "

## सुगंधाचा दर्या

विलासी जीवन नेऊ त्यांना मारतें. पण निसर्ग तीहि उणीव कशी काढतो, पहा, " निरनिराळे सुवास सुरू लागले कीं, निसर्गानें कानपुरी अत्तरवाल्याचें सोंग घेतलें आहे व तो ठेमल्यात ग्योंवलेल्या निरनिराळ्या अत्तराचे फाये काढून गिन्हाइकांना पटवीत आहे असें वाटूं लागतें. आंबेमोर, मृगधार, व हत्तीधार या मोसमांत सर्वां-मोसंब्याच्या धागा चढाओढीनें एकमेकांवर ताण करीत फुटूं लागल्या कीं, मजलपूरच्या अतराळांत सुगंधाचा दर्या उगळतो. आणि तशांत या फळझाडांच्या सुवासावरोबर जाई, जुई, नेवाळी, कुंद, मोगरा, गुलाब किंवा शेवंती यांचे सुवास वाऱ्याच्या झुळकीवरोबर रात्रीच्या प्रशांत समयीं अंतरा-अंतरानें येऊं लागले कीं, सुगंधाची अखंड रागदारी चालली आहे असें वाटतें. "

## महाराष्ट्रीय निसर्ग

महाराष्ट्रातील झाडें, फुलें व पांखरें यांचें आस्थादेनें वर्णन करण्यांत दिघे यांचा हातखंडा आहे. ते लिहितात, " आजूबाजूला गव्हाचीं पिकें सळसळत होतीं. कांद्याच्या पोगाऱ्यांनीं व गाजराच्या तुऱ्यांनीं शेतें चित्रविचित्र गालिच्याप्रमाणें दिसत होतीं व त्यावरून बगळे चरत होते. तित्तर व रानटी पक्षी खाफल्य, पिंगळे, परिस्थार, मैदान, रानं, शेतांतून रान शेतात धांवत होते. पळांना वार धरून झाडें लावलीं होतीं. मनुष्य शेतकरी

ल्लकान्या मारीत गुरें घरीं हाकीत चालले होते. सबंध दिवस चरून पोट भरलेले पक्षी झाडावर बसून परमेश्वराचीं सध्यास्तोत्रें म्हणत होते. जिकडे तिकडे शेतकऱ्यांच्या जीवनाचा आनंदीआनंद चालला होता. अशात तिन्हीसांजची पिवळ्या पिंजरी छटलेली पार वाटेनें जाताना धरित्री-देवीप्रमाणे दिसत होती."

'मराई' कादंबरींत कारवीच्या सुगंधाचें वर्णन कितीहि केलें, तरी दिघे याना ते अपुरेंच वाटत असावें "सुगंधाचा दर्या उसळला होता" किंवा "सुगंधाचा वणवा पेटला होता" अशा नाना रीतींनीं वर्णन करून ते त्या अमूर्त सुगंधाला वाचकापुढे मूर्तिमंत उभे करून पहात आहेत

तसेंच, निरनिराळ्या पशूंचे व्यापार काय चालत होते, तें पहा—"भेकर, सिटसिटी, कोल्हीं, तरस, मांजर, ससे, रानमार्जार, ऊद, चितळ हे प्राणी आधींच पाण्यावर येऊन गेले होते. लांब रानात भेकर कोकत होते, सांबर भोंगा करीत होते व चितळ कुक कुक असा आवाज काढीत होते. हे सर्व प्राणी एकदम गप्प झाले. पटविलेला परसा बिझत आला, रात्र भेसूर झाली व कमालीची शांतता वाढली. तेव्हा पाण्यावर वाघाचे डोळे मत्यामोठ्या दोन काजव्यासारखे चमकले."

## सूक्ष्म वर्णन-शैली

डोंगरातील साधी, लहानशी, वाकडीतिकडी वाट. तिचेंहि वर्णन दिघे इतक्या चारकाव्यानें करतात कीं, आपणच त्या वाटेवरून चाललो आहों असें वाटावें. ती वाट, "कधीं अजगरासारखी वर चढे तर कधीं धामणी सारखी झपाझ्यानें खालीं उतरे कधीं रानात कारवटात गडप होई तर कधीं माळावरून नागासारखी सपाटीनें जाई कधीं ती वृक्षवेलींच्या माडवातून जाई तर कधीं कधीं ती दगडाळींतून धडपडे"

हे झालें निर्जीव वाटेचें वर्णन. मग सुंदर वैशिष्ट्यांनीं नटलेल्या व्यक्तींचें स्वभावचित्र दिघे इतक्या सूक्ष्मतेनें व रम्यतेनें रेखाटतात कीं, ती ती व्यक्ति आपल्या डोळ्यापुढे उभी रहाते व स्मृतींत दीर्घकाळ घोळते एक नमुना पहा—" सोनीचा गळा सुंदर होता.

ती मुंबईस शाळेंत गावयास शिकली होती. ती गाऊं लागली म्हणजे तिचा पहाडी आवाज समुद्राच्या भरतीप्रमाणें अथांग चढू लागे. संध्याकाळचे वेळीं पडळीवर सोनी तुळशीवृंदावनाच्या अंगणात बसून गाऊं लागली कीं, आकाशाचा गाभारा दणाणून जाई व तारका गाण्याच्या आलापांनीं थरकत. पारूचाहि गळा सुंदर होता. पुष्कळ वेळा त्या दोघी गळ्यांत गळा मिसळून जोडीनें गात. त्यावेळीं त्यांचे आवाज वीनाप्रमाणें दोन ठिकाणीं घुमत. न कळे कीं यक्षकन्यका कीं अप्सरा !" सोनी, पारू व रैना या तीनहि मुली रेखेंतीलच, पण त्यांच्या व्यक्ति-रेखा दिघे यांनीं किती भिन्न भिन्न काढल्या आहेत !

## कल्पनेचें वैभव

ग्रामीण शब्दांच्या व रमणीय कल्पनांच्या थैल्या दिघे यांच्या हातांत भरलेल्या आहेत. दोन-दोन चार-चार शब्दांत ते आपली चमत्कार कल्पना प्रगट करूं शकतात. दुष्काळामुळें ओसाड दिसणाऱ्या गांवाकडे पाहून त्यांना वाटतें, " घरांच्या जोत्यांच्या रांगा विराट पुरुषानें फराळ करून रिकाम्या केलेल्या नैवेद्याच्या ताटाच्या पंक्तीप्रमाणें दिसतात. त्या घरांत राहणाऱ्या मनुष्याचा कालपुरुषानें सहार केला होता काय ? "

खेड्यांतील बाजारातील गोंगाट ऐकताच त्यांना असा भास होतो कीं, " मुंगीचा बाजार पुरा भरला आहे. एक मोठा राक्षस हों हों करून ओरडावा तसा त्याचा गोंगाट लावून ऐकूं येत आहे. "

वेळूच्या बेटांतून वारा जात असताना जो नाद होतो, तोहि कादंबरीकाराला कसा भासतो ? तर " वारा आला कीं, कळकींचीं बेटें एखाद्या राक्षसानें दात खावेत त्याप्रमाणें मधून मधून कडकडकड असा आवाज करीत होतीं. "

चंद्रोदयासारखें रम्य दृश्य शब्दांनीं मूर्त करण्यासाठीं ते असा नित्याचा घरगुती दाखला देतात कीं, " अंधाराच्या डोहातून रजनीनाथ वर हळू हळू येऊं लागला. जणूं काळ्या पाण्यात उपडी बुडवून खालीं धरून ठेवलेली चांदीची कळशी सोडून दिल्यामुळेंच वर उसळून आली आहे." रौद्र व रम्य–अशा उभयविध कल्पना लढविण्यांत कादंबरीकार चतुर आहेत.

## कातोड-कन्येची भाषा

'पाणकळा 'पेक्षा 'सराई 'त ग्रामीण संवादांचा उठाव अधिक झालेला आहे. पहिल्या कादंबरींत भुजबा व रमाजी या गुरु द्वयाची जशी जोडी, तशी दुसऱ्या कादंबरींत आप्पाजी व केमूताल्या यांची. कातोडी-समाजाचं शब्दचित्र 'सराई 'त ठसठशीतपणें रेखाटलेलें आहे. कातोडी हा 'वन्य' समाज म्हणजे निसर्गाच्या कडेखांद्यावर खेळणारा तो जितका धिप्पाड व चपल, तितकाच स्वाभिमानी व प्रामाणिक. कातोडी लोक रानावनाला, डोंगरपहाडाला, वाघालांडग्याला मुळींच न जुमानणारे. सरकारचा कायदा, त्याचे पोलिस व त्यांची बंदुक यांना ते डरत हें खरें, पण धैर्य व शिताफी या गुणांनीं ते त्यांच्यावरहि काहीं काळ मात करीत. लाडी ही एक कातोडी कन्यका, नैसर्गिक सौंदर्याची जणू मूस. तिच्या तोंडींच काय ते अस्वाभाविक संवाद आलेले आहेत.

'पाणकळा 'प्रमाणें या कादंबरींत लेखकाच्या तोंडीं शहरी भाषा घातलेली नाहीं. या सुधारणेला अपवाद एकच व तो म्हणजे लाडीचा "शंकराने चंद्रमा मस्तकीं धारण केला मी माझ्या हृदयात तुमचा मुख-चंद्रमा धारण केला" अशी गडकरी थाटेकरी भाषा "नेहेमी लाडी" बोलू लागते, तेव्हा आश्चर्य वाटतं. "मन-हरणा, मी दुरून तुझी नेत्रभेट घेईन तेवढं चकोरलेणं मला पुरे" अशी काव्यमय भाषाहि ती जगन्-कन्या काढते. एवढेंच नव्हे, तर डोंगरात बसून ती मुक्त कंठानें गाणें गाऊन दऱ्याखोऱ्या घुमविते, तेव्हाहि तिचें गाणं ग्रामीण नसतें—तर 'कर जोडुनी विनवितसें दशानुसानका!' ही तिची सारी भाषा-संपदा पाहून ती कातोड-कन्यका आहे की कॉलेज कन्यका आहे, असाच प्रश्न कोणीहि कादंबरीकारास विचारील.

## ठळक स्वभाव-चित्रे

या लाडीवर आप्पाजींचा मुलगा मनोहर पुरा भाळला. त्यामुळें तिच्या आयुष्याचें वाटोळें झालें आणि शेवटीं ती भग्न पडली. त्यावर 'अपरिहार्य!' असें मत आप्पाजीनं दिलें. पण तेवढ्यानें कादंबरीकारानी मुला

होत नाहीं. मनोहरच्या उमद्या स्वभावचित्राला हें निष्कारण गालबोट लागलें आहे. त्याचें कारण शोधलेंच तर एकच दिसतें. तें म्हणजे बंधनापलीकडील मस्त प्रणयाला मालमसाला आपल्या कादंबरींत असावा ही लेखकाची वासना. मनोहरचें ज्या मुलीशीं लग्न झालें ती मनोरमा देखणी, चतुर व सुशील अशीच दाखविलेली आहे. मनोहरच्या आईचें स्वभावचित्रहि जुन्या खानदानी घराण्यांतील थोर स्त्रीला शोभण्यासारखें आहे.

मनोहरची आई कशी दिसत असे याचें चित्र दोनचार ओळींत कादंबरीकारानें सहज रेखाटलें आहे तें असें. "ती नथ वडिलार्जित होती. करवंदांसारखे मोती होते तिला. लालडीच नुसती पांचशे रुपयाची होती. ती नथ मोठ्या आईंना घातली कीं लालडीचा तांबडा उजेड त्याचे गालावर पडे व त्या कोल्हापूरच्या अंबाबाईसारख्या सवरवीत दिसत."

बाप्पाजी तर काय ? 'शंकर स्वभावाचे'. "डोंगरांतून जसे जिवंत झरे निघतात, तशी त्याच्या हृदयांत दया होती." त्यांच्याउलट स्वभाव तात्यांचा. तात्यानें एकएक दुष्कृत्य पाहून बाप्पाजी शंकराप्रमाणें क्रुद्ध होत. अशा क्रुद्ध अवस्थेंतील बाप्पाजींचें शब्दचित्र कादंबरीकारानें किती कुशलतेनें रेखाटलें आहे पहा.

"बाप्पाजींचा क्रोध अनावर झाला. त्यांचें कपाळांतून निघालेलें उंच नाक फेंदारलें. जाड भुंवयांखालच्या सिंहासारख्या दिसणाऱ्या डोळ्यांतून ठिणग्या पडतात कीं काय, असें दिसूं लागलें. त्यांची तांब्याच्या पत्र्याप्रमाणें दिसणारी कातडी लालभडक दिसूं लागली. ते भृगुऋषीप्रमाणें तात्यांना शाप देऊन भस्म करतात कीं काय असें लोकांना वाटलें."

## मनोवेधक प्रारंभ

मनोहरचा लाडीशीं अनिर्बंध प्रणय आणि मनोरमेशीं परिमित शृंगार, हा या कादंबरीचा मुख्य कथाभाग असला, तरी त्याला कोंदण म्हणून जें ग्रामीण वातावरण दिघे यांनीं रंगविलें आहे, तेंच वाचकाच्या चित्तांत अधिक ठसण्याइतकें विस्तृत व सरस आहे. दिघे याना वर्णनाचा कंटाळा नाहीं. हौसेहौसेनें सविस्तर वर्णन ते करतात. खेड्यातील तरुणांच्या कुस्त्या,